“मागणी क्र.ओ-१० प्रधान लेखाशिर्ष
५४५२ पर्यटनावरील भांडवली खर्च..”
सन २०२२-२३ या आर्थिक वर्षातील
अर्थसंकल्पीय तरतूदीचे पुनर्विनियोजन
आदेश रद्द करण्याबाबत....

महाराष्ट्र शासन
नियोजन विभाग
**शासन निर्णय क्रमांक : तीक्षेवि-२०२३/प्र.क्र.११/का.१४४४**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ३१ मार्च, २०२३.

**वाचा :** शासन निर्णय क्रमांक:तीक्षेवि-२०२३/प्र.क्र.११/का.१४४४, दि.२० मार्च, २०२३.

**प्रस्तावना :-**

“लोणार सरोवर विकास आराखडया” अंतर्गत समाविष्ट मंजूर कामे विहित कालावधीत पूर्ण करण्याकरिता विविध विभागांतर्गत कामे सोपविण्यात आलेली आहेत. तसेच मा.उच्च न्यायालय (नागपूर खंडपीठ) यांच्या दि.२६.०७.२०२२ रोजीच्या आदेशान्वये लोणार सरोवर विकास आराखडयातील कामे विहित कालावधीत पूर्ण करण्याकरिता, लोणार सरोवर विकास समिती करिता रु.१०.०० कोटी निधी राज्य शासनाने या आदेशाच्या दिनांकापासून दोन आठवडयात उपलब्ध करुन देण्याचे निदेश दिले होते. सदर निदेशास अनुसरुन सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात **“लोणार सरोवर विकास”** आराखडयाकरिता पुनर्विनियोजनाने “श्री क्षेत्र गणपतीपुळे, ता. व जि.रत्नागिरी तीर्थक्षेत्र विकास आराखडा” मधून आर्थिक वर्ष सन २०२२-२३ अंतर्गत मागणी क्र. ओ-१०, प्रधान लेखाशिर्ष ५४५२, पर्यटनावरील भांडवली खर्च,०१, पर्यटनासाठी पायाभूत सुविधा,१०१-पर्यटन केंद्रे, (००) (११) “श्री क्षेत्र गणपतीपुळे, ता. व जि.रत्नागिरी तीर्थक्षेत्र विकास आराखडा” (कार्यक्रम), (५४५२ ०१७८) “५३ मोठी बांधकामे”या योजनेअंतर्गत बचतीमधून उपलब्ध होणाऱ्या रु.१०.०० कोटी इतकी रक्कम, पुनर्विनियोजनाने “लोणार सरोवर विकास आराखडया”करिता मागणी क्रमांक ओ-१०, प्रधान लेखाशिर्ष ५४५२, पर्यटनावरील भांडवली खर्च,०१, पर्यटनासाठी पायाभूत सुविधा,१०१-पर्यटन केंद्रे, (००) (१२) लोणार सरोवर विकास आराखडा (कार्यक्रम) (५४५२ ०१८७) “५३ मोठी बांधकामे” या उद्दिष्टासाठी एकुण रु.१०.०० कोटी इतकी तरतूद पुनर्विनियोजनाव्दारे उपलब्ध करुन देण्यास यापूर्वी संदर्भाधीन शासन निर्णयाव्दारे दिलेली मान्यता सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने रद्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे. त्यानूसार पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात **“लोणार सरोवर विकास”** आराखडयाकरिता पुनर्विनियोजनाने “श्री क्षेत्र गणपतीपुळे, ता. व जि.रत्नागिरी तीर्थक्षेत्र विकास आराखडा” मधून

आर्थिक वर्ष सन २०२२-२३ अंतर्गत मागणी क्र. ओ-१०, प्रधान लेखाशिर्ष (५४५२ ०१७८) या योजनेअंतर्गत बचतीमधून उपलब्ध होणाऱ्या रु.१०.०० कोटी इतकी रक्कम, पुनर्विनियोजनाने “लोणार सरोवर विकास आराखडया”करिता मागणी क्रमांक ओ-१०, प्रधान लेखाशिर्ष (५४५२ ०१८७) अंतर्गत एकुण रु.१०.०० कोटी इतकी तरतूद पुनर्विनियोजनाव्दारे उपलब्ध करुन देण्याबाबत निर्गमित करण्यात आलेला दि.२० मार्च,२०२३ रोजीचा शासन निर्णय तात्काळ प्रभावाने रद्द करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२३०४२५१२४७३७४८१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MILIND RAGHUNATH KULKARNI

Digitally signed by MILIND RAGHUNATH KULKARNI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=438fa70bb728385b5c81bde24450c11d5ce0d99ed18a61fb5b1685722e2c2c03, pseudonym=F52EF95C5AE57B2B7645FA5EC3BC8FC14C4F892B, serialNumber=DB6FB8A1DB6A8793024B0C8728EB79AB35DD0CAE14DDA9621D73EA4347C7856A, cn=MILIND RAGHUNATH KULKARNI
Date: 2023.04.25 12:54:25 +05'30'

**( मिलिंद कुळकर्णी )**
**उप सचिव,**

**प्रति,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा ), महाराष्ट्र राज्य-१, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
३. प्रधान सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.
४. वित्त विभाग (व्यय-८)/(अर्थ-१६) मंत्रालय, मुंबई-३२.
५. विभागीय आयुक्त, अमरावती तथा अध्यक्ष, लोणार विकास समिती.
६. जिल्हाधिकारी, बुलढाणा.
७. जिल्हा नियोजन अधिकारी, बुलढाणा.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, बुलढाणा.
९. अपर मुख्य सचिव, नियोजन यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
१०.नियोजन विभाग, का.१४२४, मंत्रालय, मुंबई.
११.निवडनस्ती, का.१४४४, नियोजन विभाग, मुंबई.